कला संचालनालयाच्या नियंत्रणाखालील शासकीय कला महाविद्यालयांमधील अध्यापकीय पदांचा आकृतीबंध.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एडीआर-२०१९/प्र.क्र.१४/ तांशि-६**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०८ जुलै, २०२०.

**वाचा:-**

१) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक एडीआर-११०१/ (८८/०१)/ तांशि-७ दिनांक ३० डिसेंबर,२००६.
२) कला उपसंचालक यांचे पत्र क्रमांक डिओअे २०१९/तीन/०२१२ दिनांक १ फेब्रुवारी, २०१९.
३) वित्त विभाग उपसमितीच्या दिनांक १६ जुलै, २०१९ च्या बैठकीचे इतिवृत्त क्रमांक पदनि २०१९/प्र.क्र.५८/आपुक दिनांक ३० जुलै, २०१९
४) वित्त विभाग उच्च स्तरीय सचिव समितीच्या दिनांक २९ ऑगस्ट, २०१९ च्या बैठकीचे इतिवृत्त क्रमांक पदनि-२०१९/प्रक्र ६५/१९/आपुक दिनांक ९ सप्टेंबर, २०१९.

**प्रस्तावना:-**

कला संचालनालयाच्या नियंत्रणाखालील कार्यालये तसेच, शासकीय कला संस्थांमधील पदांचा आढावा दिनांक ३० डिसेंबर,२००६ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आला आहे. त्यान्वये १) सर ज.जी.कला महाविद्यालय, मुंबई, २)सर ज.जी.उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई, ३)शासकीय कला व अभिकल्प महाविद्यालय, नागपूर आणि ४)शासकीय कला व अभिकल्प महाविद्यालय, औरंगाबाद अशा चार शासकीय कला महाविद्यालयांकरिता अधिष्ठाता, प्राध्यापक आणि अधिव्याख्याता या संवर्गातील १३५ अध्यापकीय पदे मंजूर करण्यात आली होती.

०२. अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद (ए.आय.सी.टी.ई.) अधिनियम ,१९८७ नुसार दृश्य कलेशी संबंधित अभ्यासक्रम हे तंत्र शिक्षण म्हणून घोषित करण्यात आले आहेत. तंत्र शिक्षणाशी संबंधित सर्व संस्थाकरीता अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद (ए.आय.सी.टी.ई.) ही केंद्र शासनाची संविधानिक अधिकार असलेली शिखर संस्था आहे. सदर संस्थेकडून तंत्र शिक्षण देणाऱ्या संस्थांकरीता वेळोवेळी निकष व मानके निश्चित करण्यात आली आहेत. सदर मानकानुसार उपरोक्त अभ्यासक्रमांसाठी आवश्यक त्या प्रमाणात शिक्षकवर्ग नियुक्त करणे बंधनकारक आहे. ही बाब विचारात घेवून अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या (ए.आय.सी.टी.ई.) निकषानुसार शासकीय कला महाविद्यालयांमधील अध्यापकीय पदांचा आकृतीबंध कला संचालनालयाकडून दि.१ फेब्रुवारी,२०१९ च्या पत्रान्वये शासनास सादर करण्यात आला होता.

०३. अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या सन २०१९-२० च्या निकषांनुसार, शासकीय कला महाविद्यालयांकरिता पदे निर्माण करण्याचा तसेच, रिक्त पदे भरण्याचा प्रस्ताव, नवीन पदनिर्मिती / पदांचे पुनरुज्जीवन व पदांचे आढावे इत्यादी प्रस्तावांची सखोल तपासणी करून शिफारशी करण्यासाठी तसेच, काल्पनिक पदे निर्माण करण्यास व रिक्त पदे भरण्यास मान्यता देण्याकरिता गठित केलेल्या उपसमितीच्या दिनांक १६ जुलै,२०१९ रोजी झालेल्या , सन २०१९ मधील चौदाव्या बैठकीसमोर विचारार्थ ठेवण्यात आला होता. सदर बैठकीमध्ये शासकीय कला महाविद्यालयांधील १५९ शिक्षकीय पदांच्या सुधारित आकृतीबंधाचा

प्रस्ताव उच्चस्तरीय सचिव समितीसमोर सादर करण्याची शिफारस करण्यात आली. तसेच, शिक्षकीय पदांच्या ८० टक्के मर्यादेत (७० पदे) पदभरती करण्याची शिफारसदेखील समितीने केली. तथापि, उपरोक्त सर्व १५९ शिक्षकीय पदे नव्याने निर्माण करावयाची असल्यामुळे त्याबाबतच्या प्रस्तावास उच्च स्तरीय सचिव समितीची मान्यता मिळाल्यानंतरच पदभरतीची कार्यवाही करावी, असा निर्णय समितीने घेतला.

०४. उपरोक्त निर्णयाच्या अनुषंगाने शासकीय कला महाविद्यालयांकरिता अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या (ए.आय.सी.टी.ई.) निकषानुसार पदनिर्मिती करण्याचा प्रस्ताव मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तर समितीच्या दिनांक २९ ऑगस्ट,२०१९ च्या बैठकीमध्ये मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. सदर बैठकीचे इतिवृत्त संदर्भ क्रमांक (४) येथील पत्रान्वये निर्गमित करण्यात आले आहे. त्यान्वये कला संचालनालयाच्या नियंत्रणाखालील शासकीय महाविद्यालयांकरिता शिक्षकीय पदे निर्माण करण्यास उच्चस्तर समितीने मान्यता दिली. तसेच, उक्त पदांच्या आढाव्यास मा.मंत्रीमंडळाच्या दिनांक ९ जून,२०२० रोजी झालेल्या बैठकीत मान्यता प्राप्त झाली आहे.

उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेता कला संचालनालयाच्या नियंत्रणाखालील शासकीय कला महाविद्यालयांमधील पदविका, पदवी आणि पदव्युत्तर पदवी स्तरावरील अभ्यासक्रमांकरिता अध्यापकीय पदांच्या निर्मितीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्याअनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय:-**

कला संचालनालयाच्या नियंत्रणाखालील १) सर ज.जी.कला महाविद्यालय, मुंबई, २) सर ज.जी.उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई, ३) शासकीय कला व अभिकल्प महाविद्यालय, नागपूर आणि ४) शासकीय कला व अभिकल्प महाविद्यालय, औरंगाबाद ह्या चार शासकीय कला महाविद्यालयांमधील खालील १३५ अध्यापकीय पदे रद्द करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (सहाव्या वेतन आयोगानुसार) | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | अधिष्ठाता | १५६००-३९१०० ग्रे.पे.८६०० | ४ |
| २ | प्राध्यापक | १५६००-३९१०० ग्रे.पे.८००० | १६ |
| ३ | अधिव्याख्याता | १५६००-३९१०० ग्रे.पे.५४०० | ११५ |
| | एकूण | | १३५ |

०२. रद्द करण्यात आलेल्या १३५ पदांपैकी २७ पदांवर नियमित अध्यापक, २६ पदांवर कंत्राटी अध्यापक आणि ११ पदांवर हंगामी अध्यापक कार्यरत आहेत. कंत्राटी आणि हंगामी अध्यापक मा.न्यायालयांनी दिलेल्या आदेशांनुसार कार्यरत आहेत. यास्तव, सद्या कार्यरत असलेल्या अध्यापकीय पदांना भूत संवर्गात ठेवण्यात आले आहे. या कार्यरत पदांना नव्याने निर्माण करण्यात आलेल्या पदांप्रमाणे वेतनश्रेणी अनुज्ञेय असणार नाही. कार्यरत पदे जस जशी रिक्त होतील त्या रिक्त पदांवर अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेने विहित केलेली अर्हता व पात्रता धारण करणारी नवीन पदे भरण्यात येतील.

०३. शासकीय कला महाविद्यालयांकरिता अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या निकषांनुसार पदविका, पदवी आणि पदव्युत्तर पदवी स्तरावरील खालील १५९ पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (७व्या वेतन आयोगानुसार) | पद संख्या |
|---|---|---|---|
| अ) | पदविका अभ्यासक्रम | | |
| १ | विभाग प्रमुख | १३१४०० Level 13A1 | ४ |
| २ | अधिव्याख्याता | ५६१००Level 9A | ४ |
| ब) | पदवी अभ्यासक्रम | | |
| १ | प्राचार्य | १४४२०० Level 14 | ४ |
| २ | प्राध्यापक | १४४२०० Level 14 | १२ |
| ३ | सहयोगी प्राध्यापक | १३१४०० Level 13A1 | २८ |
| ४ | सहायक प्राध्यापक | ५७७०० Level 10 | ८० |
| क) | पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम | | |
| १ | प्राध्यापक | १४४२०० Level 14 | १ |
| २ | सहयोगी प्राध्यापक | १३१४०० Level 13A1 | ७ |
| ३ | सहायक प्राध्यापक | ५७७०० Level 10 | १९ |
| | | एकूण | १५९ |

०४. नव्याने निर्माण करावयाच्या उपरोक्त १५९ पदांचा संस्थानिहाय आणि विषयनिहाय पदनिर्मितीचा तपशील या शासन निर्णयासोबत जोडलेल्या “परिशिष्ट अ” मध्ये दर्शविण्यात आला आहे.

०५. नव्याने निर्माण करण्यात आलेल्या पदांच्या वेतनावरील खर्च पुढील लेखाशीर्षामधून भागविण्यात यावा. ***“मागणी क्र. डब्ल्यू - ४, २२०५ कला व संस्कृती, १०१ ललित कला शिक्षण, ०२ शासकीय कला संस्था, (०२)(०१) शासकीय कला संस्था (अनिवार्य), ०१- वेतन (२२०५००३७) ”*** यासाठी आवश्यक अर्थसंकल्पीय तरतूद विधानमंडळाच्या पुढील अधिवेशनामध्ये विहीत मार्गाने करावी.

०६. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौसंक्र १४३/आपुक, दिनांक ३ मार्च,२०२० अन्वये प्राप्त सहमतीनुसार तसेच, मा.मंत्री मंडळाच्या दिनांक ९ जून,२०२० च्या बैठकीत प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००७०८१५५९५०२५०८ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Jagdeorao Tidke

Digitally signed by Satish Jagdeorao Tidke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=abbed596652773468508d937a99472988ebdda28db8c543b79abe527c99646f6, cn=Satish Jagdeorao Tidke
Date: 2020.07.08 16:11:22 +05'30'

**( सतीश ज. तिडके )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्य मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानभवन मुंबई.
६. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानभवन मुंबई.
७. सर्व सन्माननीय विधानपरिषद सदस्य / सर्व सन्माननीय विधानसभा सदस्य.
८. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
९. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१०.महालेखापाल, महाराष्ट्र ( लेखा व अनुज्ञेयता ) , महाराष्ट्र १ / २, मुंबई/नागपूर.
११.महालेखापाल ( लेखा परिक्षा), महाराष्ट्र १ / २, मुंबई / नागपूर.
१२.सर्व सह / उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.कला संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१४.अधिष्ठाता, सर ज.जी. कला महाविद्यालय, मुंबई.
१५.अधिष्ठाता, सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई.
१६.अधिष्ठाता, शासकीय कला व अभिकल्प महाविद्यालय, नागपूर.
१७. अधिष्ठाता, शासकीय कला व अभिकल्प महाविद्यालय, औरंगाबाद.
१८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२०.निवड नस्ती (तांशि ६).

**शासन निर्णय क्रमांक एडीआर-२०१९/प्र.क्र.१४/ तांशि-६, दिनांक ०८ जुलै, २०२० चे**

**परिशिष्ट "अ"**

**संस्थेचे नाव:- सर.ज.जी.कला महाविद्यालय,मुंबई - विषयनिहाय मंजूर अध्यापकीय पदांचा तपशील**

| अक्र | पदनाम | मंजूर पदे | वेतनश्रेणी | पदाचे कार्य |
|---|---|---|---|---|
| १ | प्राचार्य | १ | १४४२०० Leval १४ | प्रशासकीय/अध्यापन |
| **पदविका अभ्यासक्रम** | | | | |
| कला शिक्षक प्रशिक्षण विभाग | | | | |
| २ | विभाग प्रमुख | १ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| ३ | अधिव्याख्याता | १ | ५६१०० Leval ९ A | अध्यापन |
| शिल्प कला व प्रतिमानबंध | | | | |
| ४ | विभाग प्रमुख | १ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| ५ | अधिव्याख्याता | १ | ५६१०० Leval ९ A | अध्यापन |
| **पदवी अभ्यासक्रम** | | | | |
| रेखा व रंगकला विभाग | | | | |
| ६ | प्राध्यापक | १ | १४४२०० Leval १४ | अध्यापन |
| ७ | सहयोगी प्राध्यापक | २ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| ८ | सहयोगी प्राध्यापक (कलेचा इतिहास) | १ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| ९ | सहाय्यक प्राध्यापक | ७ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| १० | सहाय्यक प्राध्यापक (कलेचा इतिहास) | १ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| शिल्पकला विभाग | | | | |
| ११ | सहयोगी प्राध्यापक | १ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| १२ | सहाय्यक प्राध्यापक | १ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| कला व शिल्प विभाग (वस्त्र व प्रावरणे, अंतर्गत गृहसजावट, धातुकाम, मातीकाम ) | | | | |
| १३ | प्राध्यापक - वस्त्र व प्रावरणे/अंतर्गत गृहसजावट / धातुकाम / मातीकाम | १ | १४४२०० Leval १४ | अध्यापन |
| १४ | सहयोगी प्राध्यापक -वस्त्र व प्रावरणे | १ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| १५ | सहयोगी प्राध्यापक- अंतर्गत गृहसजावट | १ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| १६ | सहयोगी प्राध्यापक - मातीकाम | १ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| १७ | सहयोगी प्राध्यापक - धातुकाम | १ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| १८ | सहाय्यक प्राध्यापक- वस्त्र व प्रावरणे | ३ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| १९ | सहाय्यक प्राध्यापक- अंतर्गत गृहसजावट | ३ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| २० | सहाय्यक प्राध्यापक- धातुकाम | २ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| २१ | सहाय्यक प्राध्यापक- मातीकाम | ३ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| **पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम** | | | | |
| रेखा व रंगकला विभाग | | | | |
| २२ | सहयोगी प्राध्यापक | १ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| २३ | सहाय्यक प्राध्यापक | ३ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| शिल्पकला विभाग | | | | |
| २४ | सहाय्यक प्राध्यापक | १ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| कला व शिल्प विभाग (वस्त्र व प्रावरणे, अंतर्गत गृहसजावट, धातुकाम, मातीकाम ) | | | | |
| २५ | सहयोगी प्राध्यापक - वस्त्र व प्रावरणे | १ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| २६ | सहाय्यक प्राध्यापक- अंतर्गत गृहसजावट | १ | ५७७०० Leval १० | अध्यापन |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २७ | सहाय्यक प्राध्यापक- धातुकाम | १ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| २८ | सहाय्यक प्राध्यापक- मातीकाम | १ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| | एकूण अध्यापकीय पदे | ४४ | | |

**टीप- कला व शिल्प (वस्त्र व प्रावरणे, अंतर्गत गृहसजावट, धातुकाम, मातीकाम ) या विभागातील पदवी अभ्यासक्रमाचे प्राध्यापक पद - वस्त्र व प्रावरणे /अंतर्गत गृहसजावट / धातुकाम / मातीकाम या मधील उमेदवारातून वरील क्रमाने भरण्यात येईल.**

शासन निर्णय क्रमांक एडीआर-२०१९/प्र.क्र.१४/ तांशि-६, दिनांक ०८ जुलै, २०२० चे

परिशिष्ट “अ”

संस्थेचे नाव:-सर.ज.जी.उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई-विषयनिहाय मंजूर अध्यापकीय पदांचा तपशील

| अक्र | पदनाम | मंजूर पदे | वेतनश्रेणी | पदाचे कार्य |
|---|---|---|---|---|
| १ | प्राचार्य | १ | १४४२०० Leval १४ | प्रशासकीय/अध्यापन |
| पदवी अभ्यासक्रम | | | | |
| | प्राध्यापक | ४ | १४४२०० Leval १४ | अध्यापन |
| | सहयोगी प्राध्यापक | ९ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| | सहाय्यक प्राध्यापक | २४ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| | सहाय्यक प्राध्यापक (छायाचित्रण) | २ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| | सहाय्यक प्राध्यापक (मुद्रण) | १ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम | | | | |
| | प्राध्यापक | १ | १४४२०० Leval १४ | अध्यापन |
| | सहयोगी प्राध्यापक | १ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| | सहाय्यक प्राध्यापक | ३ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| | एकूण अध्यापकीय पदे | ४६ | | |

## शासन निर्णय क्रमांक एडीआर-२०१९/प्र.क्र.१४/ तांशि-६, दिनांक ०८ जुलै, २०२० चे
## परिशिष्ट “अ”
## संस्थेचे नाव:- शासकीय कला व अभिकल्प महाविद्यालय ,नागपूर -विषयनिहाय मंजूर अध्यापकीय पदांचा तपशील

| अक्र | पदनाम | मंजूर पदे | वेतनश्रेणी | पदाचे कार्य |
|---|---|---|---|---|
| १ | प्राचार्य | १ | १४४२०० Leval १४ | प्रशासकीय/अध्यापन |
| | | पदविका अभ्यासक्रम | | |
| | | कला शिक्षक प्रशिक्षण विभाग | | |
| | विभाग प्रमुख | १ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| | अधिव्याख्याता | १ | ५६१०० Leval ९ A | अध्यापन |
| | | पदवी अभ्यासक्रम | | |
| | | रेखा व रंगकला विभाग | | |
| | प्राध्यापक | १ | १४४२०० Leval १४ | अध्यापन |
| | सहयोगी प्राध्यापक | ३ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| | सहाय्यक प्राध्यापक (कलेचा इतिहास) | १ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| | सहाय्यक प्राध्यापक | ७ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| | | उपयोजित कला विभाग | | |
| | प्राध्यापक | १ | १४४२०० Leval १४ | अध्यापन |
| | सहयोगी प्राध्यापक | ३ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| | सहाय्यक प्राध्यापक | ६ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| | सहाय्यक प्राध्यापक (छायाचित्रण) | १ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| | सहाय्यक प्राध्यापक (मुद्रण) | १ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| | | पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम | | |
| | | रेखा व रंगकला विभाग | | |
| | सहयोगी प्राध्यापक | १ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| | सहाय्यक प्राध्यापक | ३ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| | | उपयोजित कला विभाग | | |
| | सहयोगी प्राध्यापक | १ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| | सहाय्यक प्राध्यापक | १ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| | | शिल्प कला विभाग | | |
| | सहाय्यक प्राध्यापक | १ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| | | कला व शिल्प विभाग- अंतर्गत गृहसजावट | | |
| | सहाय्यक प्राध्यापक | १ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| | एकूण अध्यापकीय पदे | ३५ | | |

शासन निर्णय क्रमांक एडीआर-२०१९/प्र.क्र.१४/ तांशि-६, दिनांक ०८ जुलै, २०२० चे

परिशिष्ट “अ”

**संस्थेचे नाव:- शासकीय कला व अभिकल्प महाविद्यालय,औरंगाबाद - विषयनिहाय मंजूर अध्यापकीय पदांचा तपशील**

| अक्र | पदनाम | मंजूर पदे | वेतनश्रेणी | पदाचे कार्य |
|---|---|---|---|---|
| १ | प्राचार्य | १ | १४४२०० Leval १४ | प्रशासकीय/अध्यापन |
| पदविका अभ्यासक्रम | | | | |
| कला शिक्षक प्रशिक्षण विभाग | | | | |
| | विभाग प्रमुख | १ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| | अधिव्याख्याता | १ | ५६१०० Leval ९ A | अध्यापन |
| पदवी अभ्यासक्रम | | | | |
| रेखा व रंगकला विभाग | | | | |
| | प्राध्यापक | १ | १४४२०० Leval १४ | अध्यापन |
| | सहयोगी प्राध्यापक | १ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| | सहाय्यक प्राध्यापक | ४ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| उपयोजित कला विभाग | | | | |
| | प्राध्यापक | २ | १४४२०० Leval १४ | अध्यापन |
| | सहयोगी प्राध्यापक | ३ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| | सहाय्यक प्राध्यापक (छायाचित्रण) | १ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| | सहाय्यक प्राध्यापक (मुद्रण) | १ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| | सहाय्यक प्राध्यापक | ७ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| कला व शिल्प विभाग- वस्त्र व प्रावरणे | | | | |
| | प्राध्यापक | १ | १४४२०० Leval १४ | अध्यापन |
| | सहयोगी प्राध्यापक | १ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| | सहाय्यक प्राध्यापक | ४ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| | | | | |
| पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम | | | | |
| रेखा व रंगकला विभाग | | | | |
| | सहयोगी प्राध्यापक | १ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| | सहाय्यक प्राध्यापक | १ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| उपयोजित कला विभाग | | | | |
| | सहयोगी प्राध्यापक | १ | १३१४०० Leval १३ A१ | अध्यापन |
| | सहाय्यक प्राध्यापक | २ | ५७७०० Leval १० | अध्यापन |
| | एकूण अध्यापकीय पदे | ३४ | | |